**मंत्रालयातील विविध विभागामधील व त्यांचे जिल्हास्तरीय यंत्रणेमधील कार्यालयीन कामकाज पध्दती, निर्णय प्रक्रीयेसंदर्भात क्वालिटी कौन्सिल ऑफ इंडिया (QCI) यांचेमार्फत मूल्यमापन अभ्यास करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण- २०२२/प्र.क्र.७७/१८ (र.व का.),**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दि. २७ एप्रिल, २०२३.

**वाचा** - क्वालिटी कौन्सिल ऑफ इंडिया (QCI) यांचा दि.९/१/२०२३ चा ई मेल संदेश.

**प्रस्तावना-**

महाराष्ट्र शासनाच्या विविध प्रशासकीय विभाग आणि त्यांच्या अधिनस्त क्षेत्रीय कार्यालयामार्फत विविध विकास कार्यक्रम / योजना राबविण्यात येतात. या विकास योजना / कार्यक्रमांची अंमलबजावणी तसेच कार्यालयीन कामकाज पध्दती, निर्णय प्रक्रीया यांचे मूल्यमापन करुन मूल्यमापन अभ्यासाद्वारे योजनांच्या अंमलबजावणीतील यशापयश आणि कामकाज / निर्णय पध्दतीतील त्रुटी निदर्शनास येतात. या त्रुटी दूर करुन संबंधीत निर्णय प्रक्रीयेत सुधारणा तसेच योजना / कार्यक्रम अधिक चांगल्या प्रकारे व परिणामकारकपणे सामान्य माणसापर्यंत पोहचाव्यात याकरिता उपाययोजना सुचविण्यासाठी क्वालिटी कौन्सिल ऑफ इंडिया (QCI) या त्रयस्थ संस्थेमार्फत मूल्यमापन अभ्यास करण्यास व त्यासाठी निधी वितरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार राज्य शासनाच्या विविध मंत्रालयीन प्रशासकीय विभाग व त्यांचे अधिनस्त क्षेत्रीय कार्यालयामार्फत विविध विकास कार्यक्रम / योजनांची अंमलबजावणी करताना घेण्यात येणा-या निर्णय प्रक्रियेसंदर्भात प्रश्नावल्यांद्वारे माहिती संकलीत करुन क्वालिटी कौन्सिल ऑफ इंडिया (QCI) या त्रयस्थ संस्थेमार्फत मूल्यमापन अभ्यास करण्यास तसेच सदर शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट -अ॰ मध्ये विहीत केल्यानुसार मूल्यमापन अभ्याससाठी रु.१८,९०,०००/- + GST + प्रवासखर्च इ. एवढ्या खर्चास शासन मान्यता देण्यात येत आहे. प्रस्तूत प्रकरणी निधी वितरण खालील प्रमाणे करण्यात येईल.

| अ.क्र. | तपशील | अदा रक्कम |
|---|---|---|
| १. | अग्रीम रक्कम (संस्थेस कार्यादेश देताना) | ५०% |
| २. | संस्थेने मूल्यमापनाचा अंतीम अहवाल शासनास सादर केल्यावर | ५०% |
| | एकूण | १००% |

२. उपरोक्त प्रमाणे क्वालिटी कौन्सिल ऑफ इंडिया (QCI) या संस्थेस ५०% अग्रीम म्हणून रु. ९,४५,०००/-( रु. नऊ लाख पंचेचाळीस हजार फक्त) इतका निधी मूल्यमापन अभ्यास करण्यासाठी वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर निधी कोषागारातून आहरण व संवितरण करण्याकरीता कक्ष अधिकारी (कार्यासन-२६) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आहे.

४. क्वालिटी कौन्सिल ऑफ इंडिया (QCI) या संस्थेला आवश्यक असलेले सर्व प्रकारचे सहकार्य करण्यासाठी तसेच समन्वयकाची भूमिका पार पाडण्यासाठी सर्व मंत्रालयीन विभागामार्फत मंत्रालयीन स्तर व जिल्हास्तराकरीता नोडल अधिकाऱ्याची नियुक्ती करण्यात यावी.

५. मूल्यमापन अभ्यास करण्याकरीता खालीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहे.

(अ) राज्य शासनाच्या विविध मंत्रालयीन प्रशासकीय विभाग व त्यांचे अधिनस्त क्षेत्रीय कार्यालयातील कार्यालयीन कामकाज पद्धती व निर्णय प्रक्रीया संदर्भातील तरतूदी विचारात घेऊन त्याअनुषंगाने मूल्यमापन अभ्यास करून मूल्यमापन अहवालाचा हेतू आवश्यकता आणि उद्दीष्टे विचारात घेऊन क्वालिटी कौन्सिल ऑफ इंडिया (QCI) या संस्थेकडून प्रश्नावल्या अंतिम करण्यात (finalisation of Questionnaire) याव्यात.

(ब) सदर मूल्यमापन अभ्यास मंत्रालयीन विभाग व त्यांचे अधिनस्त कार्यालयातील दैनंदिन कार्यालयीन कामकाजावर विपरीत परिणाम न होता पूर्ण करण्यात यावा.

(क) मूल्यमापन अभ्यासाबाबतचा कालबद्ध कार्यक्रम विहित कालमर्यादेत राबविणे क्वालिटी कौन्सिल ऑफ इंडिया (QCI) या त्रयस्थ संस्थेवर बंधनकारक राहील.

(ड) त्रयस्थ संस्थेमार्फत मूल्यमापन अभ्यासाचे सर्व कामकाज सचिव/प्र.स./अ.मु.स (प्र.सु.,र.व का.) यांचे पर्यवेक्षणाखाली व नियंत्रणाखाली पार पाडण्यात येईल.

(इ) मूल्यमापन अभ्यास करण्यासाठी आवश्यक असलेली माहिती क्वालिटी कौन्सिल ऑफ इंडिया (QCI) या त्रयस्थ संस्थेस पुरविण्याची जबाबदारी संबंधित विभागाची राहील.

(ई) मूल्यमापन अहवाल हा वस्तुनिष्ठ पुराव्यावर आधारित शासनास सादर करण्याची जबाबदारी क्वालिटी कौन्सिल ऑफ इंडिया (QCI) या त्रयस्थ संस्थेची राहील.

(ल) मूल्यमापन अभ्यास पूर्ण केल्यांनतर त्याबाबतचा स्वयंस्पष्ट अहवाल करावयाच्या उपाययोजना व शिफारशीसह क्वालिटी कौन्सिल ऑफ इंडिया (QCI) या संस्थेकडून शासनास सादर करण्यात यावा.

६. यावर होणारा खर्च मागणी क्र.ए-०४, २०५२-सचिवालय सर्वसाधारण सेवा, (००)(१७) ई गव्हर्नस प्रकल्प राबविण्याकरीता तरतूद (कार्यक्रम) (२०५२ ५०८१), १७-संगणक खर्च या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय नियोजन विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.१६१/१४४३,दि.१२.०४.२०२३ व वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.२३८/व्यय-४, दि१८.०४.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०४२७१६२१००३६०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SOMNATH NAMDEO BAGUL

Digitally signed by SOMNATH NAMDEO BAGUL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=b01714c1480a47cec5943a1c3c73ea95af0534418cf92d1ac84433 1c4116879d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4807C89831881EDE55B0D82CB9991539D1BD33C6F8A649 31D9194D5E2CBDCF56, cn=SOMNATH NAMDEO BAGUL
Date: 2023.04.27 16:30:51 +05'30'

**( सो. ना. बागुल )**
**शासनाचे सह सचिव**

**प्रत-**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२. मा.सभापती, महाराष्ट्र. विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५. सर्व मा.मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६. मा.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षण) महाराष्ट्र राज्य १/२, मुंबई/नागपूर.
७. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. सचिव, राज्य निवडणूक आयोग, पहिला मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई-४०० ०३२.
९. मा.महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
११. प्रबंधक, मा. मुंबई उच्च न्यायालय (अपील), मुंबई.
१२. प्रबंधक, मा. मुंबई उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई.
१३. प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय, १ ला मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई-४०० ०३२.
१४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, बँक ऑफ इंडिया इमारत, मुंबई-४०० ०२३.
१५. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१६. मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
१७. राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, राज्य सेवा हक्क आयोग, मुंबई.
१८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
१९. सर्व विभागीय आयुक्त.
२०. सर्व जिल्हाधिकारी.
२१. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
२२. मंत्रालयाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख.
२३. जिल्हा कोषागार अधिकारी
२४. निवड नस्ती (का.१८), सामान्य प्रशासन विभाग.

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण- २०२२/प्र.क्र.७७/१८ (र.व का.), दि.२७ एप्रिल, २०२३ सोबतचे "परिशिष्ठ अ"

| Sr. No. | Act | Timeline | Days | No. of Professionals | Cost / person days | cost |
|---|---|---|---|---|---|---|
| 1. | Finalisation of Framework and Questionnaire | 1 Weeks | 5 | 3 | 7500 | 1,12,500 |
| 2. | Questionnaire filling | 3 Weeks | 15 | 8 | 7500 | 9,00,000 |
| 3. | Analysis & Evaluation | 2 Weeks | 10 | 6 | 7500 | 4,50,000 |
| 4. | Submission of final Report | 2 Weeks | 10 | 3 | 7500 | 2,25,000 |
| 5. | Sub Total | 8 Weeks | 40 | | | 16,87,500 |
| 6. | Administrative Cost (12%) | | | | | 2,02,500 |
| | Total | | | | | 18,90,000 |

*Travel & Lodging of the professionals in Maharashtra may be charged on Actuals.
*GST as applicable shall be charged extra.